मंत्रालयीन विभागातील उच्चश्रेणी लघुलेखकांची
दिनांक ०१.०१.२०१७ रोजीची अंतिम ज्येष्ठतासूची

# महाराष्ट्र शासन

**सामान्य प्रशासन विभाग**

**शासन परिपत्रक क्रमांकः सासेसू-२३१७/प्र.क्र.३/१४-अ**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: ०२ मे, २०१७.

**वाचा** : (१) सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्रमांक : साजेसू २३१७/प्र.क्र.३/ १४-अ, दिनांक १८.०३.२०१७

(२) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक : बीसीसी १०९४/ प्र.क्र.६८/९४/ १६-ब, दिनांक १५.०६.१९९५

(३) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक : बीसीसी २००४/प्र.क्र.४५/०४/ १६-ब, दिनांक २४.०६.२००४

(४) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक : बीसीसी २००२/प्र.क्र.९३/०४/ १६-ब, दिनांक ३०.०६.२००४

## शासन परिपत्रक

मंत्रालयीन विभागातील उच्चश्रेणी लघुलेखकांची दिनांक ०१.०१.२०१७ रोजीची अंतिम ज्येष्ठतासूची संदर्भाधिन क्रमांक १ येथील दिनांक १८.०३.२०१७ च्या शासन परिपत्रकान्वये प्रसिध्द करण्यात आली आहे.

२. सदरहू ज्येष्ठतासूचीतील श्री.र.मा.बांधे यांची अनुसूचित जमाती या प्रवर्गातून दिनांक २५.४.१९९५ रोजी उच्चश्रेणी लघुलेखक पदावर नियुक्ती झाली असून त्यांचा ज्येष्ठता क्रमांक १० आहे.

३. श्री .बांधे यांचे अनुसूचित जमाती प्रवर्गाचे जात प्रमाणपत्र अनुसूचित जमाती प्रमाणपत्र पडताळणी समिती, नागपूर विभाग, नागपूर यांनी दिनांक ३०.७.२०१६ रोजी अवैध ठरविले आहे.

४. श्री.बांधे यांनी आता विशेष मागास प्रवर्गाचे जात प्रमाणपत्र सादर केले असून, जिल्हा जात प्रमाणपत्र पडताळणी समिती, नागपूर यांनी त्यांचे विशेष मागास प्रवर्गाचे जात प्रमाणपत्र दिनांक १०.२.२०१७ रोजी वैध ठरविले आहे.

५. संदर्भाधिन क्रमांक ३ व ४ येथील सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय अनुक्रमे दिनांक २४.६.२००४ व दिनांक ३०.६.२००४ नुसार अनुसूचित जमातीच्या राखीव जागांवर दिनांक १५.६.१९९५ पूर्वी सरळसेवेने नियुक्त झालेल्या विशेष मागास प्रवर्गातील कर्मचाऱ्यांना संदर्भाधिन क्रमांक २ येथील सामान्य प्रशासन विभागाच्या दिनांक १५.६.१९९५ च्या शासन निर्णयाद्वारे संरक्षण देवून अशा संरक्षित केलेल्या कर्मचाऱ्यांची सेवा ज्येष्ठता दिनांक १५.६.१९९५ अशी विचारात घेण्यात यावी अशी तरतुद करण्यात आली आहे.

६.  श्री.बांधे यांची नियुक्ती दिनांक २५.४.१९९५ म्हणजेच दिनांक १५.६.१९९५ पूर्वीची असल्याने त्यांची ज्येष्ठता दिनांक १५.६.१९९५ रोजी निश्चित करण्यात येत आहे. त्यानुसार संदर्भाधिन क्रमांक १ येथील दिनांक १८.३.२०१७ च्या शासन परिपत्रकामधील मंत्रालयीन विभागातील उच्चश्रेणी लघुलेखकांच्या दिनांक १.१.२०१७ रोजीच्या अंतिम ज्येष्ठतासूचीमधील अ.क्र.१० येथील त्यांचे नांव वगळण्यात येवून त्यांचा ज्येष्ठता क्रम श्रीमती मा.प्र.सावंत (ज्येष्ठता क्रमांक ११) व श्रीमती सु.ग.देसाई (ज्येष्ठता क्रमांक १२) यांच्या मध्ये ज्येष्ठता क्रमांक ११-अ असा सुधारित करण्यात येत आहे.

७.  सर्व मंत्रालयीन विभागांनी सदरहू शासन परिपत्रकाची प्रत वेबसाईटवरुन प्राप्त करुन घ्यावी. तसेच, आपल्या विभागातील उच्चश्रेणी लघुलेखक संवर्गातील सर्व कर्मचाऱ्यांना ज्येष्ठतासूचीची प्रत वेबसाईटवरुन प्राप्त करुन घेण्याबाबत कळवावे.

८.  सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आली असून त्याचा संकेतांक २०१७०५०२१६२६५६३००७ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Gajanan Bhimrao Gurav

Digitally signed by Gajanan Bhimrao Gurav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration, postalCode=400032, st=Andhra Pradesh, 2.5.4.20=8a5b973b0795ae988a7c005050f9180a8021798a5c1ed41ada8a72725a47b4f0, cn=Gajanan Bhimrao Gurav
Date: 2017.05.02 16:31:55 +05'30'

**( ग. भि. गुरव )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. सर्व मंत्रालयीन विभाग (आस्थापना)
२. निवडनस्ती / संग्रहार्थ (कार्यासन १४-अ)